# ॥ अवलोकन ॥

वर्ष ६ वे अंक सातवा

गुढीपाडवा चैत्र शके १९३५
११ एप्रिल, २०१३

# यजुर्वेद-दर्शन



सुंदर संस्कार व स्वाध्याय मंडळ, नाशिक

# ।।अवलोकन।।

त्रैमासिक पत्रिका

पाचवा वर्धापन विशेषांक

## ॥ यजुर्वेद-दर्शन ॥

एप्रिल २०१३

मुख्य संपादक
डॉ. [illegible]

कार्यकारी संपादक
**सौ. अपर्णा साठे**

अतिथी संपादक
डॉ. रवींद्र मुळे


● संपर्कासाठी पत्ता ●

'अवलोकन' -त्रैमासिक पत्रिका

[illegible], प्लॉट नं. ५६, पटवर्धन बाग, एरंडवणा, पुणे - ४११००४

वेब साईट- www. sundarsanskarmandal. com

ई-मेल- info@sundarsanskarmandal. in

अवलोकन
पाचवा वर्धापन अंक
यजुर्वेद-दर्शन

वर्ष सहावे : अंक पहिला

प्रकाशक :
सौ.अश्विनी मुजुमदार
सुंदर संस्कार व स्वाध्याय मंडळ, नाशिक

व्यवस्थापक :
श्री. अमित लघाटे

जाहिरात प्रमुख
श्रीहरी मोडक

| | |
|---|---|
| वार्षिक देणगी मूल्य | रू.१५०/- |
| एका अंकाचे देणगी मूल्य | रू.२५/- |
| विशेषांकाचे देणगी मूल्य | रू.१५०/- |
| आजीव सभासद | रू.१०००/- |

प्रकाशन दिनांक
११ एप्रिल २०१३

मुद्रक :
यशवंत प्रकाशन, पुणे -४११०३०.

प्रकाशन-३-बी, कोंढाणा,फ्लॅट नं.५६
पटवर्धन बाग,एरंडवणा, पुणे-४.

# अनुक्रमणिका

# ।। यजुर्वेदाचे प्रातिशाख्यग्रंथ।।

**प्रा. नीलेश जोशी**

वेद हे अपौरुषेय आहेत. आपल्यापर्यंत एखाद्या वडिलोपार्जित धनाच्या साठ्याप्रमाणे एका मात्रा, वेलांटीचा सुद्धा फरक न पडता मौखिक परंपरेने येऊन पोहोचले. ही वैदिक परंपरा पूर्णपणे शुद्ध उच्चारणावर निर्भर आहे. वैदिक मंत्रांची उच्चारण शुद्धता अबाधित राखणे हे षड्वेदांगांपैकी 'शिक्षा' या वेदांगाचे प्रमुख उद्दिष्ट होय. म्हणूनच पाणिनीय शिक्षाकार म्हणतात -

**'वाच उच्चारणे विधिम्** [१]**।'**

अर्थात वाणीचे - भाषेचे उच्चारण शास्त्र म्हणजे शिक्षा होय. तर सायणाचार्य हाच विषय अधिक स्पष्ट करताना सांगतात की, स्वरांचा आणि वर्णांचा उच्चार कसा करावा, त्यांच्या प्रकार, उपप्रकारांचा निर्देश करणारे शास्त्र म्हणजे शिक्षा होय.

**"स्वरवर्णोच्चारणप्रकारो यत्रोपदिश्यते सा शिक्षा**[२]**।"**

या उच्चारण शुद्धतेवर एवढा कटाक्ष ठेवण्याचे कारण असे की, जर एखादा शब्द जरी स्वर, वर्णदृष्ट्या चुकीचा वापरला गेला, उच्चारला, तर तो अयोग्य शब्द वाग् रूपी व्रज बनून यजमानास ठार मारण्यास प्रवृत्त होईल जसे 'इंद्रशत्रु' हे प्रसिद्ध आहे.[३]

शिक्षा ग्रंथांतर्गतच प्रातिशाख्यांचा समावेश केला जातो. मग प्रश्न असा पडतो की, शिक्षा आणि प्रातिशाख्य यात भेद काय? तर याचे समाधान उव्वटाचार्यांनी आपल्या 'ऋक्प्रातिशाख्य' या ऋग्वेदीय प्रातिशाख्यावरील भाष्यामध्ये केले आहे.[४] त्यानुसार शिक्षा ग्रंथांमध्ये सर्व सामान्यपणे सर्वच वर्णांचे उच्चारणाविषयीचे नियम प्रतिपादन केले जातात, तर प्रातिशाख्य ग्रंथांमध्ये त्या त्या शाखेतील वेदातील वर्णांच्या उच्चारण, व्याकरण, पदपाठ इत्यादी विषयांचा विचार केला जातो. थोडक्यात प्रातिशाख्य ग्रंथांमध्ये तत्तत्

---

१. पा. शि. १
२. ऋ. सं. सा. भा. पृ. २९
३. पा. शि. ५२
४. ऋक् प्रा. उबट.

शाखीय वर्णसमाम्नाय विचारात घेऊन त्यावरच विवेचन केले जाते; त्यामुळे वेदाच्या ज्या शाखेची संहिता अभ्यासत असू त्या संबंधित प्रातिशाख्याचा उपयोग तद्गत वर्णादिकांचा ज्ञानासाठी आवश्यक होता.

## यजुर्वेदाचे प्रातिशाख्य ग्रंथ

यजुर्वेदाचे मुख्य दोन भाग आहेत - (१) शुक्ल यजुर्वेद (२) कृष्ण यजुर्वेद या दोन्ही भागांच्या शाखा आहेत. शुक्ल यजुर्वेदाच्या काण्व, वाजसनेयी अशा दोन शाखा उपलब्ध असून कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय, मैत्रायणी, कठ, कपिष्ठल इत्यादी शाखा आहे.

मुळात 'प्रातिशाख्य' या शब्दाची व्युत्पत्ती. 'प्रतिशाखं भवं इति प्रातिशाख्यम्' याचा अर्थ असा की, प्रत्येक शाखेसाठी निर्माण झालेले ग्रंथ प्रातिशाख्य होय. यजुर्वेदाच्या बाबतीत म्हणावयाचे झाले तर शुक्ल यजुर्वेदाच्या काण्व, वाजसनेयी शाखांसाठी 'वाजसनेयिप्रातिशाख्यम्' आणि तैत्तिरीय, मैत्रायणी, कठ, कपिष्ठल या कृष्ण यजुर्वेदीय शाखांचे 'तैत्तिरीयप्रातिशाख्य' आहे. त्यामुळे प्रत्येक शाखेचे स्वतंत्र प्रातिशाख्य नसले तरी त्या त्या शाखांचे प्रातिनिधिकत्व करणारे प्रत्येक शाखांसाठी मिळून प्रातिशाख्ये आहेत.

## प्रातिशाख्यांचे विषय :

प्रातिशाख्य ग्रंथ हे केवळ शिक्षा वेदांगावर आधारित नसून व्याकरण, छंदशास्त्र यांचा देखील आश्रय घेतलेला दिसतो. असे ऋक्प्रातिशाख्यात छंदःशास्त्राचे स्वतंत्रपणे दोन पटलात विवेचन केलेले आढळते.[५] प्रातिशाख्यांचा मुख्य विषय 'पदपाठ' हा असून पदपाठ सर्वथा व्याकरणाच्या ज्ञानाशिवाय असंभव आहे. उव्वटाचार्यांनी तर वाजसनेयि - प्रातिशाख्यास व्याकरणाशास्त्र आणि ध्वनिशास्त्र यांचे सर्वोत्तम मिश्रण म्हटले आहे.[६] प्रतिशाख्यांचा जो मुख्य विषय पदपाठ त्यामध्ये पदांचे उच्चारण, स्वर निर्णय, ऱ्हस्व-दीर्घ विधान यांचा समावेश होतो. तसेच पदपाठास संहितेत परिवर्तित करण्यासंबंधित नियम, उच्चारणविधी वर्णविकार इत्यादी विषयांची सामान्यपणे चर्चा प्रातिशाख्य ग्रंथात केली जाते.

आता शुक्ल यजुर्वेदाचे प्रातिशाख्य वाजसनेयि - प्रातिशाख्य आणि कृष्ण

५. ऋक्. प्राति. पटल १६-१८
६. वाज. प्राति. उव्वटभा. १।१६९ वर.

चे प्रातिशाख्य तैत्तिरीय प्रातिशाख्य यातील प्रतिपाद्य विषयांचे स्वरूप जाणून घेऊ.

### वाजसनेयि-प्रातिशाख्य :

शुक्ल यजुर्वेदाचे हे प्रातिशाख्य त्याचे रचनाकार म्हणून 'स्वरसंस्कार ...पयिता कात्यायन:' अशा प्रकारे प्रातिशाखांच्या शेवटी स्पष्टपणे कात्यायनाचा निर्देश आहे. म्हणूनच कात्यायन हा प्रातिशाख्याचा रचनाकार मानला जातो. कात्यायन नावावरून अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्यामुळे या कात्यायनाविषयी अनेक विद्वानांमध्ये वाद आहेत. येथे विषयविस्तारभयास्तव हा मुद्दा मांडत नाही. या प्रातिशाख्याचा विषय समजावून घेणे अधिक महत्त्वाचे आहे.

### वाजसनेयि-प्रातिशाख्याचे स्वरूप व विषय :

हे प्रातिशाख्य श्लोक रूपात असून सूत्र रूपात आढळते. पण यातील सूत्रशैली पूर्णपणे प्रौढावस्थेस प्राप्त झालेली आढळत नाही.[७] अनेक ठिकाणी पूर्वोक्त शब्दांची पुनरावृत्ती आढळते.[८] या प्रातिशाख्यात एकूण आठ अध्याय आहेत. यामध्ये एकूण ७२६ सूत्रे आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'वृद्धं वृद्धि:' असे सूत्र असून ते मंगलपर वचन म्हणून प्रतिपादिले आहे. यामध्ये पदपाठासंबंधित स्वर, संस्कार, आगम, आदेश, लोप, वर्णविकार, प्रकृतिभाव यांचे विवेचन आढळते. यामध्ये छंद:शास्त्रासंबंधी एक देखील सूत्र आढळत नाही. आठव्या अध्यायात प्रत्येक वर्णाच्या अधिष्ठात्री देवतेचा उल्लेख आढळतो, हे विशेष आहे. त्यामुळे आठव्या अध्यायातच वर्णमाला दिलेली आढळते. तर पहिल्या अध्यायातील ४४ व्या सूत्रापासून विविध वर्णभेदांचे वर्णन आढळते. आठव्याच अध्यायात एकूण ... वर्ण सांगितले असून त्यामध्ये जिह्वामूलीय क, ख, उपध्मानीय प, फ आणि नासिक्य वर्ण तसेच ळ, ळ्ह हे वर्ण आहेत जे माध्यंदिन शाखेत आढळत नाहीत.

### उच्चारस्थान आणि करण विवेचन :

वाजसनेयि - प्रातिशाख्यामध्ये वर्णांची उच्चारस्थाने सांगितलेली आहेत; जी काही प्रमाणात वेगळी आहेत. तसेच 'करण' मात्र विशेषरूपाने सांगितले आहे. त्याची माहिती घेऊ.

---

७. वाज. प्राति. १।२०,२१ विषयांची ८।१७, १८ मध्ये पुनरावृत्ती

८. वेदांग, संपा. कुंदलाल शर्मा, १९८३, पृ. क्र. ९०

| वर्ण | उच्चारणस्थान | करण | प्रसिद्ध उच्चारण-स्थान |
|---|---|---|---|
| ट वर्ग ष | मूर्धा | जिह्वाग्र | मूर्धा |
| र | दंतमूल | हनुमूल | मूर्धा |
| ऋ | जिह्वामूल | हनुमूल | मूर्धा |
| कवर्ग, | जिह्वामूल | हनुमूल | कंठ |

उपरोक्त कोष्टकावरून स्पष्ट होईल की, ट वर्ग, ऋ, र, ष यांचे उच्चारणस्थान मूर्धा मानले असताना येथे मात्र वेगळे आहे, तसेच क वर्गाबाबत देखील. याशिवाय वर्णांचे करण हा स्वतंत्र विषय आहे.

**संकीर्ण पण महत्त्वाचे विषय विवेचन :**

वर्गीय पाचव्या व्यंजनांना अनुनासिक संज्ञा दिलेली आहे. अनुनासिक वर्णांचे उच्चारण-स्थान मुखसहित नासिका सांगितले आहे. हे वर्णन 'मुखनासिकावचनोऽनुनासिकः' या पाणिनीय अनुनासिक संज्ञेशी जुळणारे, साम्य दाखविणारे आहे. पण विशेष म्हणजे अनुस्वार आणि अनुनासिक यांच्यात स्पष्ट भेद दाखविण्यात आलेला आहे. अनुस्वाराचे उच्चारणस्थान नासिका म्हटले आहे. अनुस्वाराचा ऱ्हस्व, दीर्घ यानुसार उच्चारण कालावधी सांगितलेला आहे. अनुनासिक वर्ण पुढे असून मागे स्पर्श वर्ण उच्चारण करताना यम होतो. त्या 'यम' संज्ञकास येथे 'विच्छेद' अशी सर्वथा नवीन संज्ञा दिलेली आहे.

दुसऱ्या आणि सहाव्या अध्यायांमध्ये नाम, निपात, उपसर्ग आणि क्रियापदांच्या स्वरांविषयी विवेचन केले आहे. पाचव्या अध्यायात अवग्रहकरणाचे नियम सांगितले आहेत. त्यामध्ये पहिल्या २३ सूत्रांमध्ये पदपाठात केव्हा अवग्रह करावा हे सांगितले आहे, तर पुढील ४५ व्या सूत्रांपर्यंत अवग्रह केव्हा करू नये याचे वर्णन आहे. पहिल्या अध्यायात अष्टविध स्वरिताचे वर्णन विस्ताराने केलेले दिसते. स्वरविवेचन आहेच याशिवाय चवथ्या अध्यायात स्वरसंधीचे देखील विवेचन महत्त्वाचे आहे.

थोडक्यात सर्वांग परिपूर्ण विवेचन करण्याचा प्रयत्न या प्रातिशाख्यात केलेला दिसतो. या प्रातिशाख्यातील सूत्रांवर पाणिनीय सूत्रांचा प्रभाव देखील अनेक ठिकाणी दिसतो; पण हा एक स्वतंत्र तौलनिक अध्ययनाचा विषय होईल. आता कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय प्रातिशाख्याचा विचार करू.

**तैत्तिरीयप्रातिशाख्य :**

कृष्ण यजुर्वेदाचे तैत्तिरीय प्रातिशाख्य कार्तिकेय यांच्या नावावर आहे. वाजसनेयि - प्रातिशाख्यापेक्षा यात कृत्रिम दुर्बोधना, व्याकरणविवेचन इत्यादी गोष्टी कमी असून सरल, स्पष्ट, सोपी पण परिपूर्ण रचना आहे. या प्रातिशाख्यातील उदाहरणे ही तैत्तिरीय संहितेत उपलब्ध होत नाही, त्यावरून 'त्रिभाष्यरत्न' याच्या सौम्यार्य रचनाकारांनी ती उदाहरणे ऋग्वेदादिक शाखांतर्गत असावीत असे मानले आहे.[१]

तैत्तिरीय प्रातिशाख्य सुद्धा सूत्रात्मक शैलीत रचलेले आहे. त्यामुळे अल्पाक्षरत्व, अनुवृत्ती इत्यादी गोष्टींमुळे क्लिष्टता निर्माण होत असली तरी अर्थ निश्चिती सहज साध्य असून विषयाची स्पष्टता लवकर होते. सामान्य व्याकरणाच्या नियमांवर विवेचन येथे केलेले आढळत नाही, ही अतिशय महत्त्वाची बाब आहे.

**तैत्तिरीयप्रातिशाख्यातील विषय विवेचन :**

तैत्तिरीय प्रातिशाख्यात एकूण २४ अध्याय आहेत. हे अध्याय प्रथम प्रश्न आणि द्वितीय प्रश्न या विभागात विभागले आहेत. दोन्ही विभागत १२-१२ अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात वर्णमाला, स्वर, उपसर्ग, अवग्रह इत्यादींचे विवेचन असून स्वीकृत संज्ञा, परिभाषा स्पष्ट केलेल्या आहे. दुसरा अध्याय हा वर्णांचे उच्चारस्थान व प्रयत्न यावर प्रकाश टाकणारा आहे. अनुप्रदान, संसर्ग, स्थान, करण आणि परिणाम ही वर्णांची पाच भेदक तत्त्वे म्हणून सांगितली आहेत.[२] वर्णांच्या प्रयत्नांची चर्चा करताना येथे स्पर्श वर्ण आणि त्याचे सवर्ण ऊष्माण वर्ण उच्चारस्थान एकच असते, जसे - इ, च वर्ग, य, श यांचे उच्चारणस्थान तालू मानले जाते.[३] येथे ऊष्माण वर्णांच्या करणमध्यास विवृत म्हटले आहे.[४] तर यकाराचे स्थान तालू आणि करण जिभेचा मध्य व अंतभाग मानला आहे.[१] सर्व स्वरांचा आभ्यंतर प्रयत्न विवृत मानला जातो.[२] तर येथे 'ए' या स्वराचा प्रयत्न ईषत्स्पृष्ट सांगितला आहे.[३]

---

१. तै. प्राति. त्रिभाष्यरत्न, १।४।११
२. तै. प्राति. २।२३।२
३. इचुयशानां तालुः। लघु. सि. कौ. १।१।९ वरील भाष्य
४. तै. प्राति. १।२।४४-४५
१. तै. प्राति १।२।४०
२. लघु. सि. कौ. १।१।९ वरील भाष्य,
३. तै. प्राति १।२।२२

तिसऱ्या अध्यायात पदपाठात आवश्यक दीर्घीकरण, ह्रस्वीकरणाचे वर्णन असून वर्णागम, लोप, विकार, प्रगृह्य, प्रकृतिभाव इत्यादी विषयांचे विवेचन पहिल्या १२ अध्यायात केलेले आढळते. द्वितीय प्रश्नात स्वर विवेचन करीत १५ व्या अध्यायात अनुनासिक, अनुस्वार यांचे वर्णन आहे. २१ व्या अध्यायात स्वरांच्या प्रकाराचे, प्रचय, नासिक्य याचे वर्णन आढळते. येथेच स्वरभक्तीचे वर्णन असून ती रेफ आणि ऊष्माण वर्णांमध्ये आढळते असे म्हटले आहे.[४] हे विधान ऋक् प्रातिशाख्यातील स्वरभक्तीशी तुल्य आहे.[५]

तैत्तिरीयप्रातिशाख्यामध्ये 'यम' वर्णांची व्याख्या ऋक् प्रातिशाख्याहून भिन्न आहे. येथे निरनासिक स्पर्श वर्णांच्या नंतर अनुनासिक वर्ण असेल तर त्यामध्ये अनुनासिक वर्णांच्या आगमास 'यम' म्हटले आहे.[६] उदाहरणांमध्ये भेद नसून येथे केवळ पूर्व वर्णासमान मानले नसून नासिक्य वर्णासमान मानले आहे हा विवेचनातील भेद आहे. उदा. आत्मनः = आत्म्ँमनः, ब्राह्मणः = ब्राह्मँमणः इत्यादी. ऋक्प्रातिशाख्यानुसार 'चक्ष्नतुः = चखूँक्ष्नतुः' असे होते[७] ते येथे 'चक्ष्नँनतु' असे होईल.

थोडक्यात तैत्तिरीय प्रातिशाख्य हे देखील स्वतःच्या विषय विवेचनाबाबतीत सर्वोत्तम असून विषय स्पष्टता चांगली आहे. यामध्ये दिलेली सगळीच उदाहरणे त्या - त्या विशिष्ट शाखेत मिळाली पाहिजेत हा दुराभिमान झाला. तो नियम समजणे हे उदाहरणे देण्यामागील मुख्य उद्दिष्ट असते. तेव्हा त्या त्या प्रातिशाख्य ग्रंथाचे स्वतःचे असे महत्त्व हे असते. म्हणूनच ते स्वतंत्र रीतीने मांडण्यात आले.

याशिवाय कृष्णयजुर्वेदाच्या चारायणीय प्रातिशाख्य व मैत्रायणीय प्रातिशाख्य यांचा उल्लेख आढळतो. मात्र दोन्ही प्रातिशाख्ये आज उपलब्ध नाहीत. त्यामुळे त्या विषयी काहीच माहिती देता येत नाही. तेव्हा यजुर्वेदाची वाजसनेयी - प्रातिशाख्य व तैत्तिरीय प्रातिशाख्य ही दोन प्रातिशाख्य उपलब्ध असून त्यांची माहिती, परिचय करून देण्याचा प्रयत्न केला आहे.

---

४. तत्रैव २।२१।१५

५. ऋ. प्राति १।१७।१
ऋ. प्राति ६।१३।१

६. तै. प्राति २।२१।१२

७. ऋ. प्राति ६।८।३